**विधानमंडळ / संसदेच्या महिला सदस्यांना विशेषत्वाने सन्मानाची व सौजन्याची वागणूक देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः विमंस- २०१८/ प्र. क्र.२००/ १८ ( र. व का. )**
मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ५ मार्च, २०२०.

वाचा : १) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : विमंस २०१३/प्र. क्र. ६७/१८ (र. व का.), दिनांक २७ जुलै,२०१५.
२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : संकिर्ण-२०१७/प्र. क्र.१७१/१८ (र. व का.), दिनांक २७ ऑक्टोबर,२०१७.
३) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : संकिर्ण-२०१८/ प्र. क्र. ९७ /१८ (र. व का.), दिनांक ३० मे,२०१८.
४) महाराष्ट्र विधानसभा, विशेषाधिकार समितीचा सन २०१६-१७, २०१७-१८ चा दि. २२ मार्च, २०१८ रोजी सभागृहाला सादर केलेला अहवाल.

**परिपत्रक :**

विधानमंडळ / संसद सदस्यांना सन्मानाची व सौजन्याची वागणूक देणे, त्यांचेकडून आलेल्या पत्र / अर्ज / निवेदनांवर सत्वर कार्यवाही करणे इ. संदर्भात सर्वंकष मार्गदर्शक सूचना संदर्भाधीन दिनांक २७ जुलै,२०१५ च्या शासन परिपत्रकान्वये निर्गमित करण्यात आलेल्या आहेत.

२. नाशिक जिल्ह्यात माहे जुलै व ऑगस्ट,२०१६ या महिन्यात झालेल्या अतिवृष्टीमुळे जिल्हयातील बागलाण तालुक्यातील सार्वजनिक मालमत्तेच्या व शेतीच्या झालेल्या नुकसानीसंदर्भात आढावा घेण्यासाठी त्या मतदारसंघातील विधानसभा सदस्यांसमवेत आयोजित करण्यात आलेल्या बैठकीस संबंधित तहसिलदार अनुपस्थित राहिल्याने उद्भवलेल्या सन्माननीय सदस्यांच्या विशेषाधिकार भंग व अवमानाच्या प्रकरणासंदर्भात विधानसभा विशेषाधिकार समिती यांनी सन २०१६-१७, २०१७-१८ चा अहवाल सभागृहास सादर केला आहे. सदर अहवालामध्ये शासकीय अधिकाऱ्यांकडून विधानमंडळाच्या महिला सदस्यांना सन्मानाची व सौजन्याची वागणूक मिळत नसल्याबाबत तीव्र नाराजी व्यक्त करण्यात आलेली आहे. सबब उक्त अहवालातील परिच्छेद ६ मध्ये करण्यात आलेल्या शिफारशीस अनुसरुन संदर्भाधीन दिनांक २७ जुलै,२०१५ चे परिपत्रकातील मार्गदर्शक सूचनांमध्ये खालील सूचनांचा समावेश करण्यात येत आहे:-

**विधानमंडळ / संसद विशेषत्वाने महिला सदस्यांना सन्मानाची व सौजन्याची वागणूक देण्यासंबंधी सूचना:**

(i) मंत्रालयीन विभागांना कळविण्यात येते की, त्यांच्या नियंत्रणाखालील सर्व शासकीय कार्यालये, निमशासकीय कार्यालये / संस्था, शासन नियंत्रित व तत्सम संस्थांमधील अधिकारी / कर्मचाऱ्यांच्या निदर्शनास आणून देण्यात यावे की, विधानमंडळ / संसदेचे सदस्य विशेषत: महिला सदस्य शासकीय कार्यालयांना कामानिमित्त भेट देतील, त्या वेळी त्यांना आदराची व सौजन्यपूर्ण वागणूक द्यावी. त्यांचे म्हणणे शासकीय अधिकारी / कर्मचाऱ्यांनी काळजीपूर्वक ऐकून घ्यावे व शासकीय नियमानुसार शक्य असेल तेवढी मदत लोकप्रतिनिधींना त्यांच्या कामकाजात करावी.

(ii) दिनांक २७ जुलै,२०१५ मधील मार्गदर्शक सूचनांप्रमाणेच या सूचनेचे सर्वांनी तंतोतंत पालन करावे. यात कुचराई / टाळाटाळ केल्यास संबंधित अधिकारी / कर्मचाऱ्यांविरुध्द शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम १० (२) व (३) अनुसार तसेच महाराष्ट्र नागरी सेवा नियमानुसार शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात येईल.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेताक २०२००३०५१०१८०४७७०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AJOY MEHTA

Digitally signed by AJOY MEHTA
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=6cd985f04d38fef505754856131307df708dca9bbcea90df80882d2257d79126, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=85c1fa2cdc7cf754bc479fb6ae97bc65889de163fa7e4c775fec1ed9e37334f3, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=AJOY MEHTA
Date: 2020.03.05 17:44:17 +05'30'

**(अजोय मेहता)**
**मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/ विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२. सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य,
३. मा. राज्यपालांचे सचिव ( ५ प्रती),
४. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव ( ५ प्रती ),

५. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव / स्वीय सहायक,
६. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक,
७. मा. महाअधिवक्ता, महाराष्ट्र राज्य,
८. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
९. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
१०. प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,
११. प्रबंधक , लोकायुक्त व उप लोकायुक्त यांचे कार्यालय,
१२. सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
१३. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१४. प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
१५. मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, मुंबई,
१६. राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त, राज्य सेवा हक्क आयोग, मुंबई,
१७. सर्व विभागीय आयुक्त,
१८. सर्व जिल्हाधिकारी,
१९. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२०. सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख /
२१. प्रादेशिक प्रमुख / कार्यालय प्रमुख,
२२. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई ( ५ प्रती ),
२३. भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी. डी. ओ. बॅरेक नं.१, योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईंट, मुंबई-२०
२४. इंडियन नॅशन काँग्रेस, महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस (आय) समिती, टिळक भवन,टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-२५.
२५. नॅशनल काँग्रेस पार्टी, राष्ट्रपती भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईंट, मुंबई-२१.
२६. शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-२८.
२७. बहुजन समाज पार्टी,डी-१इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई-१,
२८. भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभवन, एस. व्ही. पटेल रोड, मुंबई.
२९. भारतीय कम्युनिस्ट (मार्क्सवादी) पार्टी, महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी मुंबई.
३०. सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
३१. निवड नस्ती ( कार्यासन १८ ).